प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत जिल्हा
जिल्हा परिषद कोल्हापूर येथील
कार्यकारी अभियंता महाराष्ट्र ग्रामीण रस्ते
विकास संस्था (प्रमंग्रासयो) यांचे
कार्यालयाच्या इमारतीच्या दुरुस्ती व
नुतनीकरणास प्रशासकीय मान्यता
देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**शासन निर्णय क्र. ग्रासयो-२०११/प्र.क्र.७०/यो-०८**
**मंत्रालय,मुंबई-३२**
**दिनांक - २३ जून, २०११**

**संदर्भ** - १) कार्यकारी अभियंता महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (प्रमंग्रासयो) **जिल्हा कोल्हापूर** यांचे पत्र क्र.काअ/म.रा.र.वि.स/कोल्हापूर/इ-दू / २०१० , दि. २२ ऑक्टोंबर,२०१०
२) अधिक्षक अभियंता महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (प्रमंग्रासयो) विभाग पुणे यांचे पत्र क्र.अअ/प्रमंग्रासयो/पुणे/१२३१/१०, दि. १३जानेवारी २०११.

**प्रस्तावना :-**

अधिक्षक अभियंता , महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था,(प्रमंग्रासयो),विभाग पुणे यांनी कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (प्रमंग्रासयो) **, जिल्हा कोल्हापूर** यांचे कार्यालयीन इमारतीचे दुरुस्ती व नुतनीकरणाच्या प्रस्तावास मान्यता मिळण्याची शिफारस सदर्भीय पत्र क्र.२ अन्वये केली आहे.

सदर प्रस्तावात कार्यालयीन इमारतीच्या नूतनीकरण व दुरुस्तीसाठी ₹ १५.९० लक्ष इतक्या रकमेची मागणी करण्यात आली आहे. कार्यकारी अभियंता महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (प्र.मं.ग्रा.स.यो.) मुख्य अभियंता यांचे पुणे कॅम्प कार्यालय यांनी प्रयोगशाळेच्या इमारतीच्या नुतनीकरणाचे सविस्तर अंदाजपत्रकाची फेर तांत्रिक छाननी केली आहे.

त्यानुसार अधिक्षक अभियंता , महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था,(प्रमंग्रासयो),विभाग पुणे यांनी कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (प्रमंग्रासयो) **, जिल्हा कोल्हापूर** यांचे कार्यालयीन इमारतीचे दुरुस्ती व नुतनीकरणाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मंत्री ग्राम सडक योजनेअंतर्गत कोल्हापूर जिल्हा परिषद यांचेकडील कागलकर हाऊस या इमारतीतील सदर कार्यालयास वापरण्यास दिलेल्या भागाचे ₹ ११.८७ लक्ष (रु. अकरा लक्ष सत्याऐंशी हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या नुतनीकरण व दुरुस्तीच्या प्रस्तावास पुढील अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयाअन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(१) कार्यालयाच्या वापरकरीता सदर इमारतीतील जागेचे रितसर वाटप झालेले आहे, यांची पडताळणी करुनच काम सुरु करण्यात यावे.

(२) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त ६ महिन्यात पूर्ण होईल, याबाबत संबधित कार्यकारी अभियंता (बां) जि.प. यांनी नियोजन करावे व पूर्णत्वाचा दाखला शासनास सादर करावा.

(३) कार्यालयीन इमारतीचे नूतनीकरण व दुरुस्तीचे काम शासनाच्या प्रचलीत मार्गदर्शक तत्वाप्रमाणे करण्यात यावे. तसेच खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे सादर करावी.

(४) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीत काम पूर्ण करण्याची दक्षता घ्यावी.

(५) या नुतनीकरण व दुरुस्तीचा खर्च प्रधान मंत्री ग्राम सडक योजनेच्या प्रशासकीय निधीतून भागविण्यात यावा.

२. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०११०६३०२०००४१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(वॉल्टर डिमेलो)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत -

१) मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
२) उप सचिव (प्रमंग्रासयो) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
३) श्री. सुनिल मोने (वित्तीय नियंत्रक ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
४) अधीक्षक अभियंता (प्रमंग्रासयो)(पुणे विभाग) पुणे
५) कार्यकारी अभियंता ,( प्रमंग्रासयो), कोल्हापूर
६) कक्ष अधिकारी /योजना-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
७) निवड नस्ती.